**उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय महाविद्यालये/ संस्थांमधील प्राध्यापक, गट-अ यांच्या सन २०२५ मधील प्रशासकीय बदलीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
शासन आदेश क्र. संकीर्ण-२०२५/प्र.क्र.९३/ई-११४२५०३/मशि-१
मंत्रालय विस्तार, मादाम कामा मार्ग
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई -४०० ०३२.
दिनांक : ३० मे, २०२५.

**आदेश**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकीय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतूदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने, उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय महाविद्यालये/संस्थांमधील खाली नमूद प्राध्यापक, गट-अ या संवर्गातील अध्यापकांची त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्रमांक ५ मध्ये दर्शविलेल्या पदावर प्रशासकीय कारणास्तव बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अध्यापकांचे नाव | विषय | सध्याचे महाविद्यालय/संस्था | बदली नंतरचे महाविद्यालय/संस्था |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | डॉ. अंजली मिलींद रहाटगावकर | रसायनशास्त्र | शासकीय विज्ञान संस्था, नागपूर | शासकीय विदर्भ ज्ञान विज्ञान संस्था, अमरावती |

२. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

३. संबंधित प्राचार्य/संचालक यांनी बदली झालेल्या अध्यापकांना बदलीच्या ठिकाणी रूजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच संबंधित अध्यापकांनी सध्या कार्यरत असलेल्या महाविद्यालय/संस्थेतून त्यांची बदली नंतरची पदस्थापना केलेल्या महाविद्यालयात/ संस्थेत तात्काळ रुजू व्हावे.

४. संबंधित प्राचार्य/संचालक यांनी बदली झालेले अध्यापक संबंधित महाविद्यालय/संस्थेतून कार्यमुक्त होऊन रुजू होण्यासाठी आल्यानंतर त्यांना विनाविलंब रुजू करुन घ्यावे. संबंधित प्राचार्य/संचालक यांनी रुजू होण्यासाठी आलेल्या अध्यापकास रुजू करुन न घेतल्यामुळे सक्तीचा प्रतिक्षाकाळ ठरुन काम न करता वेतन व भत्ते देण्याचा प्रसंग उद्भवल्यास संबंधित प्राचार्य/संचालक यांना जबाबदार धरण्यात येईल. तसेच, कार्यमुक्त झाल्यापासून बदली झालेल्या ठिकाणी रुजू होईपर्यंतच्या कालावधीत सदर अध्यापकांना कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येणार नाही.

५. बदली झालेल्या अध्यापकांना बदलीच्या ठिकाणी रुजू होण्यासाठी महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील तरतुदीनुसार पदग्रहण अवधी शासनाच्या प्रचलित नियमानुसार अनुज्ञेय राहील.

६. बदली करण्यात आलेल्या अध्यापकांचे पुढील महिन्याचे (जून महिन्यातील) वेतन हे बदली झालेल्या महाविद्यालयातूनच आहरीत करण्यात येईल याची दक्षता संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांनी घ्यावी.

७. सदर बदली आदेशाबाबतचा कार्यपालन अहवाल संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांनी १५ दिवसांत शासनास सादर करावा.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५३०१५२०५४७५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ASHOK SHANKAR MANDE

Digitally signed by ASHOK SHANKAR MANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=fabb29d28cdbcbe5c9eed052cb38b8cb567068a0090e237f095c6e50a52a6cf5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D96FF33E8AF31F745D84F3411F94D896382FAA82659B10108672887A87D6FC7C, cn=ASHOK SHANKAR MANDE
Date: 2025.05.30 15:21:59 +05'30'

**(अशोक मांडे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण.
३) सर्व प्राचार्य/ संचालक, शासकीय महाविद्यालये/संस्था.
४) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१ व २, मुंबई व नागपूर.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर व अमरावती.
६) संबंधित प्राध्यापक (कार्यालय प्रमुखांमार्फत)
७) निवड नस्ती.

**प्रत,**

१) मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई.